सार्वजनिक बांधकाम विभागाकडील लाडेगांव सनगांव चनई रा.मा.२३२ प्रजिमा ५५ कि.मी. ७/७०० ते ८/५०० (८०० मी.) इतकी लांबी अंबाजोगाई नगर परिषदेस हस्तांतरित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.२२/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०४ ऑक्टोबर, २०२१.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र./मुअऔ/का-१४/प्रआ/रस्ते हस्तांतरण/३७२१, दि.१६/०७/२०१९.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सार्वजनिक बांधकाम विभागाकडील लाडेगांव सनगांव चनई रा.मा.२३२ प्रजिमा ५५ कि.मी. ७/७०० ते ८/५०० (८०० मी.) इतकी लांबी अंबाजोगाई, नगर परिषदेस हस्तांतरित करणेबाबत विनंती केली आहे. तसेच उपरोक्त रस्ता नगर परिषद, अंबाजोगाई यांचेकडे हस्तांतरित करण्यास नगरपरिषद, अंबाजोगाई यांनी मंजूरी दिलेली आहे. त्यानुषंगाने सदर रस्ता नगर परिषद, अंबाजोगाई यांचेकडे हस्तांतरित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

सदर रस्ता हा प्रमुख जिल्हा मार्ग क्र.५५ दर्जाचा असून, हस्तांतरित करण्याची एकूण लांबी ८०० मी. आहे. अंबाजोगाई शहरासाठी भगवानबाबा चौक ते यशवंतराव चव्हाण चौक हा बाह्यवळण रस्ता विकसित झालेला आहे. त्यामुळे शहरात येणाऱ्या अवजड वाहनांची वाहतूक या रस्त्यावरून होत नाही वाहतूक फक्त धान्य बाजार व जनावरांचा बाजार करीता होते.

लाडेगांव सनगांव चनई रा.मा.२३२ प्रजिमा ५५ कि.मी. ७/७०० ते ८/५०० (८०० मी.) इतकी लांबी अंबाजोगाई नगर परिषदेस हस्तांतरित करण्याबाबत नगर परिषद, अंबाजोगाई यांनी मंजूरी दिलेली आहे.

त्यानुषंगाने खालील अटींच्या अधीन राहुन सार्वजनिक बांधकाम विभागाकडील लाडेगांव सनगांव चनई रा.मा.२३२ प्रजिमा ५५ कि.मी. ७/७०० ते ८/५०० (८०० मी.) इतकी लांबी अंबाजोगाई नगर परिषदेस हस्तांतरित करण्यात येत आहे.

१) सदर रस्ता हस्तांतरित केल्यानंतर देखभाल व दुरूस्तीचा खर्च अंबाजोगाई, नगर परिषदेच्या निधीतून करण्यात येईल. सदर रस्त्याच्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनाकडून कोणतेही अतिरिक्त अनुदान देता येणार नाही.

२) सदर रस्त्यावरील अतिक्रमणे हटवण्याची जबाबदारी अंबाजोगाई, नगर परिषदेची राहील.

३) सदर रस्त्याबाबतचे सर्व न्यायलयीन प्रकरणे हाताळण्याची जबाबदारी अंबाजोगाई, नगर परिषदेची राहील.

४) भविष्यात आवश्यकतेनुसार सदर रस्ता पुन्हा सा.बां.विभागाच्या ताब्यात द्यावयाचा निर्णय झाल्यास सदर रस्ता सुस्थितीत सा.बां.विभागाच्या ताब्यात देण्याची जबाबदारी अंबाजोगाई, नगर परिषदेची राहील व याबाबत कोणत्याही प्रकारच्या रस्त्यावर कामे केल्याबाबतच्या निधीची मागणी/दावे/खर्चाची मागणी इत्यादी मान्य होणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००६१६१९१०५२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2021.10.06 16:21:52 +05'30'

**( ग. सं. कचरे )**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
३) मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) अधिक्षक अभियंता,मुंबई बांधकाम मंडळ, उस्मानाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
५) जिल्हाधिकारी, बीड.
६) मुख्याधिकारी, नगरपरिषद, अंबाजोगाई.
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबाजोगाई.
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
११) निवडनस्ती.